आरोग्य सेवा संचालनालयाच्या आस्थापनेवरील वैद्यकीय अधिका-यांची ५४५ अधिसंख्य पदे पुढे चालू ठेवण्याबाबत.

महाराष्ट्र शासन
सार्वजनिक आरोग्य विभाग
शासन निर्णय, क्रमांकः पदआ २०१७/प्र.क्र. १४४ /आरोग्य ३
१० वा मजला, संकुल इमारत,
जी.टी. रुग्णालय आवार, मुंबई - ४०० ०३२.
दिनांक : २३ जून, २०१७.

वाचा :

१) शासन निर्णय, सार्वजनिक आरोग्य विभाग, क्रमांकः पदनि २०१५/प्र.क्र. ४४१/सेवा ३, दिनांक १४.१२.२०१६.
२) आरोग्य सेवा संचालनालय, मुंबई यांचे पत्र क्रमांकः आसेसं/५४५ अधिसंख्य पदे/अपपुचाठेप्र/कक्ष २-अ/१५९३/१७, दिनांक १९.०६.२०१७.

**शासन निर्णय :**

उपरोक्त संदर्भाधीन अनुक्रमांक-१ येथील शासन निर्णयान्वये सार्वजनिक आरोग्य विभागाच्या नियंत्रणाखालील आरोग्य सेवा संचालनालयाच्या आस्थापनेवर कार्यरत वैद्यकीय अधिकाऱ्यांनी सेवांतर्गत पदव्युत्र पदवी /पदविका अभ्यासक्रमासाठी प्रवेश घेतल्यामुळे रिक्त् राहणारी पदे भरण्यासाठी आरोग्य सेवा संचालनालयाच्या आस्थापनेवर एकूण ५४५ वैद्यकीय अधिकाऱ्यांची (वेतनश्रेणी रुपये १५६००-३९१०० ग्रेड पे ५४००) अधिसंख्ये पदे निर्माण करण्यात आली आहेत.

२. आता या शासन निर्णयान्वये सदर ५४५ वैद्यकीय अधिका-यांची अधिसंख्य पदे भरण्यात आल्याच्या दिनांकापासून ते दि.३०.०९.२०१७ पर्यंत पुढे चालू ठेवण्यास मुदतवाढ देण्यात येत आहे.

३. सदर पदावरील खर्च खालील नमूद लेखाशिर्षातून खर्ची घालण्यात यावा आणि हा खर्च सन २०१७-१८ या वर्षाकरीता मंजूर असलेल्या अनुदानातून भागविण्यात यावा :-

मागणी क्रमांक - आर-१,
मुख्यलेखाशिर्ष "२२१० - वैद्यकीय सेवा व सार्वजनिक आरोग्य,
(०१)(०४) - गट वैद्यकीय अधिकारी (२२१० ०३७१) (०१) वेतन"

४. हा निर्णय,शासन निर्णय, वित्त विभाग, क्रमांक-पदनि २०१६/प्र.क्र. ८/१६/आपुक,दि १०.०२.२०१७ अन्वये प्रशासकीय विभागास प्रदान केलेल्या अधिकारानुसार निर्गमीत करण्यात येत आहे.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०१७०६२३१७०१४३६३१७ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

Roshani Dinesh Kadam Patil

Digitally signed by Roshani Dinesh Kadam Patil
DN: CN = Roshani Dinesh Kadam Patil, C = IN, S = Maharashtra, O = Government Of Maharashtra, OU = Public Health Department
Date: 2017.06.23 17:14:10 +05'30'

**(रो.दि.कदम-पाटील)**
अवर सचिव, महाराष्ट्र शासन.

प्रत,

१. महालेखापाल १/ २ (लेखा परीक्षा/लेखा व अनुज्ञेयता), महाराष्ट्र, मुंबई/ नागपूर.
२. आयुक्त, आरोग्य सेवा तथा अभियान संचालक, राष्ट्रीय आरोग्य अभियान, मुंबई
३. संचालक, आरोग्य सेवा, मुंबई.
४. सह संचालक, आरोग्य सेवा (वैद्यकीय), मुंबई.
५. सर्व उप संचालक, आरोग्य सेवा मंडळ.
६. सर्व जिल्हा आरोग्य अधिकारी.
७. सर्व जिल्हा कोषागार अधिकारी.
८. वित्त विभाग (कार्यासन- व्यय-१३/ अर्थसंकल्प-१९), मंत्रालय, मुंबई.
९. सार्वजनिक आरोग्य विभाग (कार्यासन- सेवा-२/अर्थसंकल्प).
१०.निवडनस्ती (आरोग्य ३).